अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, गट-“ब” (राजपत्रित) या संवर्गातील पदावर नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन आदेश क्रमांक: नामनि-१२१९/प्र.क्र.२७/का.१४२७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - १४ जानेवारी, २०२०

**वाचा** :- महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.१७१५/२३१६/आठ, दिनांक २४/०५/२०१९.

## शासन आदेश

संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, सामान्य राज्यसेवा, गट-“ब” (राजपत्रित), अर्थ व सांख्यिकी संचालनालय या पदावरील नामनिर्देशनाद्वारे नियुक्तीसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये खालील तक्त्यात दर्शविलेल्या प्रवर्गातून प्रतीक्षायादीतील उमेदवार म्हणून शिफारस केली आहे. त्यानुसार ते, संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, गट-“ब” (राजपत्रित) या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून; त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, गट-“ब” (राजपत्रित) या संवर्गातील पदावर सुधारित वेतन मॅट्रीक्समधील S-१५:४१,८००-१,३२,३०० रुपये या वेतन संरचनेत नियुक्ती करण्यात येत आहे. त्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवारांचे नाव व जातीचा प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री.पाटील गजानन गावडू | खुला | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, हिंगोली |
| २ | श्री.बावकर अक्षय रघुनाथ | खुला | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, यवतमाळ |

२. ही नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून करण्यात येत आहे:-

अ) महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियम) नियमावली, १९८२ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणांच्या अधीनतेने त्यांची ज्येष्ठता राहील.

ब) उपरोक्त सर्व उमेदवारांची महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९७९ मधील प्रकरण तीन, नियम ११ (टिप-२) नुसार, वैद्यकीय तपासणी करण्यात आली असून संबंधित वैद्यकीय मंडळाची प्रमाणपत्रे शासनास प्राप्त झाली आहेत.

क) ज्या उमेदवारांनी यापूर्वी हिंदी व मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण केलेली नसेल किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्यांना सूट मिळाली नसेल तर, यासंबंधी शासनाच्या प्रचलित नियमानुसार भाषा परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण करणे आवश्यक आहे.

ड) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९/०३/२००३ व शासन निर्णय, माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.), क्रमांक-मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ४ फेब्रुवारी, २०१३ नुसार त्यांनी त्यांच्या नियुक्तीपासून दोन वर्षात संगणक हाताळणीसंबंधी शासनाने विहित केलेली परीक्षा उत्तीर्ण केल्यासंबंधीचे प्रमाणपत्र सादर करावे; अन्यथा हा कालावधी संपताच त्यांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल व याबाबत त्यांचे कोणतेही निवेदन विचारात घेतले जाणार नाही अथवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून कोणालाही सूट दिली जाणार नाही अथवा परीक्षा उत्तीर्ण होण्यास मुदतवाढही दिली जाणार नाही.

ई) संबंधित उमेदवार शासन सेवेत रुजू झाल्यानंतर जर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असतील, तर त्यांना शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/९२/८, दिनांक २/१२/१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. मात्र गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

फ) जर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास आणि/ किंवा विहित विभागीय परीक्षा (अन्य काही परीक्षा असल्यास) सदर परीक्षा परिविक्षा कालावधीमध्ये उत्तीर्ण न केल्यास आणि त्यांचे काम किंवा वर्तणूक अयोग्य/ अननुरुप आढळल्यास संबंधित अधिकारी सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

च) संबंधित उमेदवारांना एक पत्नी/पती हयात असताना दुसरा विवाह करता येणार नाही. तसेच शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-२०००/प्र.क्र.१७/ २०००/१२, दिनांक १ जुलै, २००५ नुसार त्यांनी लहान कुटुंबाचे प्रमाणपत्र सादर करावे.

३. संबंधित उमेदवारानी त्यांच्या पदस्थापनेच्या पदावर सदर आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत रुजू व्हावे. संबंधित उमेदवार विहित कालमर्यादेत रुजू न झाल्यास त्यांना नियुक्ती स्वीकारावयाची नाही, असे गृहित धरुन त्यांच्या नियुक्तीचे आदेश रद्द केले जातील.

४. सदर उमेदवारांनी नियुक्तीनंतरच्या पदस्थापनेच्या पदावर रुजू होतेवेळी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे अर्जासोबत जोडलेल्या सर्व प्रथम प्रमाणपत्रांच्या मूळ प्रती (जन्म तारीख, वय, शैक्षणिक अर्हता, अनुभवाचे प्रमाणपत्र, मागासवर्गीय जातीचे प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, महाराष्ट्र

राज्याचे अधिवास प्रमाणपत्र इ.) तपासणीसाठी संबंधित कार्यालय प्रमुखाकडे सादर करावीत. त्या प्रमाणपत्राच्या वैधतेवर त्यांना रुजू करुन घेण्यात येईल.

५. संबंधित कार्यालयप्रमुखांनी त्यांच्या कार्यालयात पदस्थापना करण्यात आलेल्या उमेदवारांचे सेवाभिलेख तयार करुन आवश्यक त्या नोंदी कराव्यात.

६. उपरोक्त उमेदवार हे जर राज्य शासनाच्या इतर विभाग/कार्यालयात काम करीत असतील तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीचे ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने पुरेश्या वेळेत कार्यमुक्त करावे. तसेच नियुक्तीधारक उमेदवार इतरत्र कार्यरत असल्यास सदर सेवेतून त्यांनी विहित पद्धतीने कार्यमुक्त झाल्याचे प्रमाणपत्र सादर करावे किंवा इतर कोणत्याही सेवेत कार्यरत नसल्याबाबतचे घोषणापत्र भरुन द्यावे. संबंधित उमेदवारांनी त्यांना पूर्वीच्या कार्यालयाने कार्यमुक्त केल्याचे आदेश/प्रमाणपत्र अथवा शासकीय/निम-शासकीय/खाजगी सेवेत कार्यरत नसल्याबाबतचे घोषणापत्र संबंधित पदस्थापना दिलेल्या कार्यालयात सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही.

७. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५ नुसार दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्ती होणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यासाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू केली आहे. यास्तव जे उमेदवार शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:अंनियो-१००६/८७/सेवा-४, दिनांक १२ जानेवारी, २००७ मधील अटींची पूर्तता करीत असतील व ज्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरत असेल; असे उमेदवार वगळता इतर सर्व उमेदवारांना उक्त दिनांक ३१ ऑक्टोंबर, २००५ च्या शासन निर्णयानुसार नवीन परिभाषित अंशदान योजना लागू ठरेल.

८. संबंधित उमेदवारांनी पदभार स्वीकारल्याचा रुजू अहवाल संबंधीत विभाग प्रमुखामार्फत तात्काळ शासनास सादर करावा.

९. सदर उमेदवारांनी नियुक्तीच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत स्वग्राम घोषित करणे आवश्यक आहे. तद्नंतर त्यांनी स्वग्राम घोषित केल्यास त्यात फेरबदल करता येणार नाही.

१०. विशिष्ट ठिकाणी पदस्थापना/बदली/नियुक्ती मिळण्यासाठी खासदार/आमदार/ लोकप्रतिनिधी यांचेमार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित उमेदवारांविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

११. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्य उपरोक्त उमेदवारांच्या नियुक्त्या ह्या, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्रमांक २०५३/२०१४ प्रकरणी होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या तसेच समांतर आरक्षणाच्या मुद्यासंर्भात तसेच अन्य मुद्यांसंदर्भात विविध मा. न्यायालय/ मा. न्यायाधिकरणात दाखल करण्यात आलेल्या न्यायिक प्रकरणातील अंतिम न्याय निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

१२. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११४११३४५०५५१६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6dd848a31422ed36ba4503d4744b6dc20833c851babace12b16b7bba3f67cca2, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2020.01.14 16:49:54 +05'30'

**( तु.पु.हिर्लेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) श्री.पाटील गजानन गावडू, मु.कडलगे ब्रु, पो.ढोलगरवाडी, ता.चंदवड, जि.कोल्हापूर-४१६ ५०७.
२) श्री.बावकर अक्षय रघुनाथ, मु.पो.कोळकी (मालोजीनगर), ता.फलटण, जि.सातारा- ४१५ ५२३.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र- २ नागपूर.
२. मा.मंत्री (नियोजन)/ मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव
३. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (*पत्राने).
५. आयुक्त, मानव विकास, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद.
६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
७. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, हिंगोली/ यवतमाळ
८. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
९. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
१०. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
११. सहसंचालक, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली/ यवतमाळ
१३. सर्व सह सचिव/ उप सचिव/ विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२ व १६-ब), मंत्रालय, मुंबई.
१५. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१६. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, हिंगोली
१७. जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, यवतमाळ
१८. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती.